**कोषागारातून रोख देय अनुदान**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सन २०१७- १८ या आर्थिक वर्षासाठी पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रमासाठी (WQMS) केंद्र हिश्श्याचे अनुदान वितरित करण्याबाबत
लेखाशीर्ष (२२१५ ९९८९)

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
### शासन निर्णय क्रमांकः निधीवि २०१७/प्र.क्र.१४/पापु-१२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ७ वा मजला, लोकमान्य टिळक रोड,
मुंबई- ४०० ००१
तारीख: २० जुलै, २०१७

**वाचा-**

१) शासन निर्णय क्रमांकः केंद्र शासनाचे मंजूरी आदेश क्रमांक- No.W-११०२०/६६/२०१५-Water-I/२७० दि.२३.०३.२०१७
२) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३ दि.१८.०४.२०१७

**प्रस्तावना-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत राज्य हिश्श्याच्या पाणी गुणवत्ता व संनियंत्रण (WQMS) या घटकांसाठी लेखाशीर्ष २२१५ ९९८९ याखाली सन २०१७-१८ या वर्षाकरिता एकूण रु.२,७२,७३,०००/-(अक्षरी रुपये दोन कोटी बहात्तर लाख त्र्याहत्तर हजार फक्त) इतका नियतव्यय मंजूर करण्यात आला असून तो अर्थसंकल्पीय प्रणालीवर पूर्णपणे अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे वित्त विभागाने कळविले असून सदर उपलब्ध अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत पाणी गुणवत्ता व संनियंत्रण (WQMS) या घटकांसाठी मागणी क्र.वाय-०२, लेखाशीर्ष-२२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता ०१, पाणी पुरवठा १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम ०२, जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदान (०२) (२९) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम- पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय्य (राज्यक्षेत्र), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९९८९) या लेखाशीर्षाखाली रु.२,७२,७३,०००/- (अक्षरी रुपये

दोन कोटी बहात्तर लाख त्र्याहत्तर हजार फक्त) इतके अनुदान केंद्र शासनाकडून संदर्भाधीन क्रमांक १ येथील आदेशान्वये राज्यास प्राप्त झाले आहे. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी, अवर सचिव (रोख शाखा),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे BEAMS प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम रु.२,७२,७३,०००/-(अक्षरी रुपये दोन कोटी बहात्तर लाख त्र्याहत्तर हजार फक्त) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरित करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा) (श्री.का.जा.धलपे), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उपसचिव (श्री.म.भ.सावंत), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव(रोखशाखा) (श्री.का.जा.धलपे), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांच्या कार्यालयातून आहरित करुन ती पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या बँक खात्यात जमा करावी व तदनंतर स्वतंत्र धनादेशान्वये सदर रक्कम पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांच्या बँक खात्यात जमा करावी.

४. पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई यांनी सदर रक्कम केंद्र शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार तसेच राज्य शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करावी.

५. यावर होणारा खर्च मागणी क्र.वाय-०२, लेखाशीर्ष-२२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता ०१, पाणी पुरवठा १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम ०२, जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदान (०२) (२९) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम- पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षणासाठी अर्थसहाय्य (राज्यक्षेत्र), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९९८९) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं- २०१६/ प्र.क्र.८९/ अर्थ-३ दिनांक २०/०४/२०१६ ; वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक पूरक- २०१६/प्र.क्र.१२८/ अर्थसंकल्प-३, दि.१२/०८/२०१६ तसेच वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं- २०१७/ प्र.क्र.७५/ अर्थ-३ दिनांक १८/०४/२०१७ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर प्रकरणी वित्त विभाग परिपत्रक दि. १८/०४/२०१७ मधील अनुक्रमांक ७ ते १८ येथील अटींची तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ३ ते ९ येथील बाबींची पूर्तता होत

असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. उपरोक्त रु.२,७२,७३,०००/-(अक्षरी रुपये दोन कोटी बहात्तर लाख त्र्याहत्तर हजार फक्त) एवढा निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा करण्यात आल्याबाबतची खात्री वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेकडून करण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७२०१५४३४८३१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakant Krishna More

Digitally signed by Chandrakant Krishna More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=11ac200219edb36f7777ee1101657bea4271090267228122b638d6f2cdedad62, serialNumber=2314cf333e070f9936792bc95890fa89b2f617a931b2b577b703fa858f3df433, cn=Chandrakant Krishna More
Date: 2017.07.20 16:36:07 +05'30'

(चं.कृ.मोरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
२. महालेखापाल, महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५. संचालक लेखा व कोषागारे, मुंबई
६. मुख्य लेखा परीक्षक स्थानिक निधी लेखा, मुंबई/नागपूर
७. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई
८. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
९. उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
११. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद सर्व
१२. आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. उपसचिव (रोखशाखा) यांचे स्वीय सहायक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

१४. उपसचिव तथा प्रकल्प संचालक (कार्या.पापु-१२)यांचे स्वीय सहायक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

१५.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र.पापु-०४ व पापु-२०

१६.निवड नस्ती कार्या.पापु-१२